**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : एव्हीएन-२००८/प्र.क्र.५६९/२८-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ सप्टेंबर,२००९.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. एव्हीएन १००८/प्र.क्र.५६९/०८/२८-अ, दिनांक ६ एप्रिल, २००९
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : पूरक १००९/प्र.क्र.८३/ २००९/ पंचवीस , दिनांक ८ जुलै, २००९.

**प्रस्तावना :-** राज्य शासनाने महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचेमार्फत सार्वजनिक खाजगी सहभाग तत्वावर (नवीन चाकण) जि. पुणे येथे नवीन आंतरराष्ट्रीय विमानतळाची उभारणी करण्याचा आणि या प्रित्यर्थ संदर्भाधीन दिनांक ६ एप्रिल, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना बीज भांडवल (Seed Money) म्हणून एकूण रु. २०० कोटी सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत निर्णय घेतला आहे. त्यापैकी उपरोक्त संदर्भाधीन दि. ६ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये रु. २० कोटी अनुदान आकस्मिकता निधीमधून मंजूर करण्यात आले आहे. सदर आकस्मिकता निधीची भरपाई विधी मंडळाच्या जुन, २००९ अधिवेशनामध्ये पूरक मागणीव्दारे करण्यात आली आहे.

१.१ दरम्यान चालू आर्थिक वर्षी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना राजगुरुनगर, जि. पुणे, (२) मौजे. काकडी, जि. अहमदनगर, (३) मौजे. बोरामणी - तांदुळवाडी, जि. सोलापूर, (४) जळगाव आणि (५) बेलोरा, जि. अमरावती या ठिकाणच्या विमानतळांच्या विस्तार / विकासासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करण्यासाठी विधी मंडळाच्या जुन, २००९ च्या अधिवेशनामध्ये एकूण रु. २१२.९१ कोटी रकमेची पूरक मागणी सादर करण्यात आली होती. त्यानुसार संदर्भाधीन शासन परिपत्रक, दिनांक ८ जुलै, २००९ अन्वये पूरक मागणीव्दारे मंजूर झालेली तरतूद वितरणासाठी प्रशासकीय विभागांच्या स्वाधीन करण्यात आली आहे.

**शासन निर्णय** :

२. राजगुरुनगर (नवीन चाकण), जि. पुणे येथील नवीन आंतरराष्ट्रीय विमानतळाचा महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचेमार्फत सार्वजनिक खाजगी सहभाग तत्वावर विकास करण्यासाठी बीज भांडवलापोटी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना चालू आर्थिक वर्षी पूरक मागणीव्दारे मंजूर झालेल्या रु. २१२.९१ कोटी तरतूदीपैकी रु. ३०.०० कोटी ( रुपये तीस कोटी फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. या प्रकरणी उपरोक्त रु. ३०.०० कोटी ( रुपये तीस कोटी फक्त), मंजूर केलेली सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना अदा करण्यासाठी सहायक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रु. ३०.०० कोटी ( रुपये तीस कोटी फक्त),सहाय्यक अनुदान मासिक निधी वितरण प्रणालीनुसार वितरित करण्यात यावे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी या प्रकरणीचा विहित अहवाल शासनास व महालेखापालांना सादर करावा.

४. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च ३०५३-नागरी विमानचालन १९० - सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य - राज्य योजना (००)(०२) महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस विमानतळाच्या विकासाकरिता सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (३०५३ ०१६४) या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागवावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने सदर विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५१९/०९/व्यय-४, दिनांक ४/९/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०९१७१७३४५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( अं. वि. अंभिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,
वर्ल्ड ट्रेड सेंटर, मुंबई,
२. संचालक/सहायक संचालक, विमान चालन संचालनालय, हॅंगर क्र. ६, जुहू विमानतळ, मुंबई
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. वित्त विभाग, का.-अर्थसंकल्प-१४/ व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. जिल्हाधिकारी, पुणे
१०.कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.२५, मंत्रालय, मुंबई ३२,
११. निवड नस्ती.